राज्य स्तरावर क्रीडा प्रशिक्षण शिबिर
आयोजन करण्यासाठी निधी वितरण.

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांक : निविप्र ४०१९ /प्र.क्र ४६ /क्रीयुसे -२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : २६नोव्हेंबर, २०१९.

**वाचा**

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.राक्रीधो २०१२/प्र.क्र.२३१/ क्रीयुसे-१, दि. १३ फेब्रुवारी, २०१४.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. अनुवि ४९१९/ (३२/१९)/ अर्थसंकल्प; दि.०४ एप्रिल २०१९.
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,पुणे यांचे पत्र क्र. शिक्रीपी/तरतूद/राप्रशि/लेअ/२०१९-२०/का-१३/१८४; दि.१७ मे,२०१९.
४. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.निविप्र ४०१९/प्र.क्र.४६/ क्रीयुसे-२, दि. १८ जून, २०१९.
५. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,पुणे यांचे पत्र क्र. शिक्रीपी/तरतूद/राप्रशि/लेअ/२०१९-२०/का-१३/४६६; दि.२० जुलै, २०१९.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्याचे क्रीडा धोरण २०१२ मध्ये राज्य स्तरावर क्रीडा प्रशिक्षण शिबिरांचे आयोजन करण्याबाबत तरतुद आहे. तसेच उपरोक्त संदर्भ क्र.०१ च्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरावरील क्रीडा शिबिराचे आयोजन या योजनेस मान्यता देण्यात आली असुन या योजनेंतर्गत १५ खेळ प्रकारातील खेळांसाठीच्या सुविधा व निवास सुविधा उपलब्धतेनुसार तालुका/जिल्हा/विभागीय क्रीडा संकुल/शिवछत्रपती क्रीडा नागरी संकुल,महाळुंगे,पुणे येथे करण्यात येते.

सदर योजनेसाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षात रु.१९६.२९ लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आले असून संदर्भ क्र.०२ च्या शासन निर्णयान्वये रु.५८.८९ लक्ष इतका निधी लेखानुदानाद्वारे मंजूर करण्यात आला आहे. सन २०१९-२० या वर्षामध्ये खेळाडूकरिता राज्यस्तरीय क्रीडा प्रशिक्षण शिबिरांचे आयोजन करण्यासाठी निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव संचालनालयाने संदर्भ क्र. ३ च्या पत्रान्वये शासनास सादर करण्यात आला होता. त्यानुषंगाने संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये रु. ५८.८९ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आले आहे. आता संचालनालयाने संदर्भ क्र. ५ च्या पत्रान्वये रु. ५८.८९ लक्ष इतका निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता. त्या अनुषंगाने निधीच्या वितरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१९-२० या वर्षामध्ये खेळाडूकरिता राज्यस्तरीय क्रीडा प्रशिक्षण शिबिरांचे आयोजन करण्यासाठी रु.५८.८८ लक्ष (रुपये अठ्ठावन्न लाख अठ्ठयाऐंशी हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च “मागणी क्र. ई-३, २२०४-क्रीडा व युवक सेवा- १०४ क्रीडा व खेळ (०९) खेळाडूंना शिष्यवृत्त्या व पुरस्कार (०९) (१६)राज्य स्तरावर क्रीडा प्रशिक्षण शिबिरांचे आयोजन, (२२०४ ५६२६) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदान (वेतनेत्तर)” या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयामधील अटी व शर्ती लागू राहतील.

४. शासनाच्या सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधीत उपसंचालक/जिल्हा क्रीडा अधिकारी/लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२१३१२३३१०४१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2019.12.13 12:41:48 +05'30'

**( इम्तियाझ काझी )**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१.मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य.
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
५. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)

७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
८. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)
९. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१०. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),
११. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१२. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. निवड नस्ती (क्रीयुसे-२)